कुंवर तिलकसिंह, सामान्य रूग्णालय,गोंदिया येथील (जी.एन.एम.) नर्सिंग स्कुल वसतीगृहाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता (शुद्धीपत्रक).

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन शुद्धीपत्रक क्रमांकः नर्सिंग २०१३/प्र.क्र.१६६/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीखः ३ ऑक्टोबर, २०१५.

**वाचा**

1. **शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः नर्सिंग २०१३/प्र.क्र.१६६/ आरोग्य-४, दि.६.०६.२०१४.**
2. **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एफएलडी-३५ A१३/ प्र.क्र.३२१/फ-१०, दि.३१.१०.२०१३.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कुंवर तिलकसिंह, सामान्य रूग्णालय,गोंदिया येथील (जी.एन.एम.) नर्सिंग स्कुल वसतीगृहाच्या बांधकामाच्या एकूण रूपये ९,५०,१९,७२४/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. या रक्कमेमध्ये या नर्सिंगस्कुल करीता आवश्यक जागेकरीता जमीन अधीग्रहणाकरीता रक्कमेची तरतूद करण्यात आलेली नाही. वन विभागाने सदर जमीनीचा ताबा आरोग्य विभागाकडे देण्यास दिनांक ३१.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये अनुकलता दर्शविली आहे. तथापि, सदर अनुकुलता सदर जागेच्या नक्त वर्तमान मुल्याची रक्कम रूपये ३१,३०,०००/- इतकी रक्कम प्रकल्प यंत्रणेने भरण्याच्या अटीच्या अधीन राहून दर्शविलेली आहे. या अनुषंगाने उक्त प्रशासकीय मान्यता प्राप्त रक्कमेमध्ये जागेच्या मुल्याच्या रक्कमेचा समावेश करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुदधीपत्रक**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक नर्सिंग २०१३/प्र.क्र.१६६/ आरोग्य-४, दि.६.०६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या कुंवर तिलकसिंह, सामान्य रूग्णालय,गोंदिया येथील (जी.एन.एम.) नर्सिंग स्कुल वसतीगृहाच्या बांधकामाच्या एकूण रूपये ९,५०,१९,७२४/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यामध्ये जमीन अधिग्रहणाकरीता रूपये ३१,३०,०००/- इतक्या रक्कमेचा समावेश करण्यात येत असून सदर प्रशासकीय मान्यता रक्कम रूपये ९,८१,४९,७२४/- ( अक्षरी रूपये नऊ कोटी एक्क्याऐंशी लक्ष एकोणपन्नास हजार सातशे चोवीस मात्र) इतकी वाचण्यात यावी.

सदर शुद्धीपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या , अनौ.सं.क्र. ६०/ इमा-१, दि.२०.०७.२०१५ अन्वये शासकीय इमारतींच्या बांधकामांना मंजूरी देण्याबाबतच्या सचिव समितीने चक्रीय पद्धतीने दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००३१३३८०३२७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.07 11:56:25 +05'30'

**अ.ता.उईके**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रुषा), मुंबई.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा ( नागपूर मंडळ ), नागपूर.
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, गोंदिया.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
८. महालेखापाल,१/२महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा )/ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
९. वित्त विभाग ( विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमा-३), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती(आरोग्य-४).
    सार्वजनिक बांधकाम विभाग ( इमा-३), मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.